पुस्तकाचे नांव: गिडूची शाळा (Gidoochi Shala)

प्रकार : बालकथा

लेखिका : अनघा हिरे, नाशिक

anagha.hiray@gmail.com

9422284116

प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान®

esahity@gmail.com

www.esahity.com

विनामूल्य वितरणासाठी उपलब्ध

- आपले वाचून झाल्यावर आपण हे फ़ॉरवर्ड करू शकता.
- हे ई पुस्तक वेबसाईटवर ठेवण्यापुर्वी किंवा वाचनाव्यतिरिक्त कोणताही वापर करण्यापुर्वी ई साहित्य प्रतिष्ठानची परवानगी घेणे आवश्यक आहे.
- या पुस्तकातील लेखनाचे सर्व हक्क लेखिकेकडे सुरक्षित असून पुस्तकाचे किंवा त्यातील अंशाचे पुनर्मुद्रण किंवा एकांकिका, नाटक. सिनेमा. सिरियल. स्टेज शो,ऍनिमेशन किंवा तत्सम रुपांतर किंवा भाषांतर करण्यासाठी लेखिकेची परवानगी घेणे आवश्यक आहे.

या पुस्तकातील चित्रे कागदावर प्रिंट करून किंवा ही चित्रे कॉम्प्युटरवर **paintbrush** मध्ये उघडून मुलांना त्यात रंग भरायला द्या. आणि रंग भरता भरता त्यांना गोष्ट समजावून द्या.

गोष्ट मनोरंजक तर आहेच पण त्यातून मुलांना अनेक सामाजिक, सांस्कृतिक आणि पर्यावरणाचे संदेश मिळतात.

# गिडूची शाळा

सावधान !

विश्राम !

सावधान !

विश्राम!

गिडू आवाजाकडे पाहत पाहत आईच्या पाठीमागे जात होती.

‘‘आई काय आहे गं इथे ?’’

‘‘माझ्या पिल्ला ही शाळा आहे. ’’

‘‘आई मला पण जायचंय गं इथे खेळायला.  चल ना, आपण जाऊ ना तिथे. ’’

गिडूच्या आईला सकाळी, सकाळी दाणे, अळ्या गोळा करण्याव्यतिरिक्त दुसरं कामच नव्हतं. रिकामावेळ शेतात इकडे तिकडे फिरण्यातच घालवायचा मग मुली बरोबर शाळेत गेलेल काय वाईट  आणि काही दिवसांनंतर तर तिला इथे पाठवायचच आहे.  मग आजपासूनच पाठवल तर काय हरकत.  असा विचार करून गिडूला घेऊन गिडूची आई शाळेत जायला लागली.

वा वा ! आई किती सुंदर शाळा आहे.  गवताच्या पायऱ्या चढता चढता गिडू आईशी बोलत होती.

पायऱ्या चढून झाल्यावर सरळ मोठ्ठच्या मोठ्ठ गवताचं पटांगण.

पटांगणातून पुढे गेल्यावर मोठ्ठीच्या मोठ्ठी गवताची खोली.

खोलीच्या बाहेर आल्यावर मोठ्ठाच्या मोठ्ठा गवताचा ढिग.

हे सगळं वातावरण गिडूला फार आवडलं.  आई तिथल्या मोठ्या मोठ्या कोंबड्यांशी बोलत होती.  गिडू आपल्या  मित्रमैत्रिणीं मध्ये जाऊन खेळायला लागली.

''गिडू मी येईन हं थोडावेळाने तुला घ्यायला.  तो पर्यंत तू इथेच खेळत बैस.  मी आल्याशिवाय कुठे जाऊ नकोस.''

गिडूच्या आईने गिडूला बजावले.  आणि ती परत जायला निघाली.

गिडूच्या हट्टानेच गिडूला शाळेत टाकलं.  पण गिडू आता फार कासावीस झाली.  आई आपल्याला सोडून जातेय तरी कुठे?  आई शिवाय आपण एकटे राहिलोच नव्हतो. पण आता तर आई जातेय.

''आई''.

गिडूने जोराची हाक मारली ''तू कुठे जातेय?

''मी इथेच आहे बाळा. मला तुझ्या शाळेत नाही थांबता येणार. तू इथे छान छान खेळ हं. मग मी तुला घ्यायला येईन.

आईला सोडून इथ रहाणे गिडूला मान्य नव्हत.े इथं थांबून आपण काय करणार? आणि आई बाहेर राहून काय करणार? गिडू आपली आई लांबवर जाईपर्यंत आईकडे पहात होती.

पण क्षणातच सर्व मित्रमैत्रिणींबरोबर ती खेळायला पण लागली.

तेवढ्यात तिथे कोकोच आले. कोकोच म्हणजे तिथले सर. त्यांना सगळेच कोकोच या नावानेच हाक मारायचे.

''अरे वा ! आज आपल्या वर्गात ही छान गब्बू गब्बू मुलगी कोण आली बर ?''

''गि.....डू...'' सर्वपण एका सुरातच बोलले.

'' गिडू बेटा इकडे ये. तुला काय काय येते ?''

कोकोचच्या ह्या प्रश्नाच उत्तर काय द्यायच हे गिडूला कळलेच नाही. त्यामुळे त्याच सोप्प उत्तर ‘‘नाही ’’ एवढच तिने दिले.

‘‘चला तुला दाणे वेचायला शिकवतो ’’

‘‘हे तर मला येते. ’’

‘‘मग तुला अळी शोधायला शिकवतो ’’

‘‘हे तर मला येते. ’’

‘‘अरे बापरे ! तुला तर सगळच येत, मग आता चला सगळे जण आपण खेळायला जाऊ.’’

कोकोच पुढे पुढे आणि कोकोचच्या मागे मागे सगळे लहान पिल्ले, एका लाईन मध्ये जाऊ लागले.

कोकोच गवताच्या ढिगांवरुन उड्या मारत आले.

कोकोचच्या मागून सगळे उड्या मारत आले, मग कोकोच गवताच्या खोलीतून गोल गोल फिरत आले.

कोकोचच्या मागे सगळेच गोल गोल फिरत आले.

मग कोकोच मोठ्या गवताच्या पटांगणातून फिरले.

कोकोचच्या मागे सगळेच मोठ्या पटांगणातून फिरले.

मग कोकोच गवताच्या पायऱ्या उतरले.

कोकोचच्या मागे सगळेच गवताच्या पायऱ्या उतरले.

कोकोच जिथे जिथे जात तिथे तिथे सगळेच जात. मध्येच कोकोचनं आपली चोच जमिनीला टेकवली. सगळ्या पिल्लांनी तेच केले.

''अरे मुलांनो हिं बघा केवढी मोठी अळी मी शोधली. नुसताच थोडी जमिनीला चोच टेकवत होतो?

‘‘कोकोच हे बघा मी पण अळी शोधली !’’

‘‘कोकोच मला तांदूळ सापडला.’’

‘‘कोकोच हे बघा माझ्याकडे काय आहे ?’’

‘‘को....को.....च हे काय आहे ? ए.....व्ह........ढ मोठ्ठं ! ’’

‘‘अरे बापरे, गिडू कुठे सापडलं गं हे तुला ? चल इकडे घेऊन ये. आपण सगळ्या मुलांना दाखवू.’’

गिडूला भल मोठ गांडूळ सापडलं होत. वळवळणार गांडूळ चोचीत पकडून गिडू कोकोच जवळ जात होती. पण लटकणाऱ्या गांडूळाने गिडूच्या चोचीतच एसचा आकडा काढला. गिडू घाबरली. घाबरुन तिने चोचीतून गांडूळ सोडून दिले. गिडूची घाबरगुंडी उडालेली बघून इतर पिल्ले हसायला लागली. पण गिडूने परत ते गांडूळ आपल्या चोचीत उचलले. आणि कोकोचच्या पायाशी आणून टाकले.

मग आज मुलांच्या शिकण्याचा विषय होता गांडूळ! कोकोचनं ते कधी चोचीत उचलले, कधी पायाने ओढले. आज मुलांना पण गांडूळाशी खेळायला फार मजा वाटत होती. प्रत्येकाने गांडूळाला चोच लावून बघितली आणि पाय लावून बघितला.

काय वाटतय? काय झाल असेल त्या गांडूळाच पुढे? सगळीच पिल्लं काय शहाणी होती? सगळ्यांनाच काय गांडूळाचाच अभ्यास करायचा होता? तर अस काही नाही हं. वर्गात जशी शहाणी पिल्ल होती तसेच वात्रटही होती. मग दोन वात्रट पिल्लांनी सरते शेवटी गांडूळाला दोन टोकाला पकडले आणि खेचले. तसे ते दोघ बूदूकन लांब जाऊन पडले. दोन पिल्लांच्या चोचीत दोन तुकडे आले. हे बघून अजून दोन वात्रट पिल्ले त्यांच्याकडें गेली. त्यांनी परत दोन टोकांना पकडले आणि खेचले. तसे परत ते चौघे बुटूकन लांब पडले. झाले, दोनाचे चार तुकडे व्हायला पण वेळ लागला नाही. आणि बघता बघता त्यांनी ते फस्त पण केले.

सगळी पिल्ले आपले जोरजोरात हसू लागले.

सुर्य आता मानेच्या वरच्या रेषेत होता म्हणजे आता शाळा सुटणार. गिडूला शाळेच्या अवतीभवतीच सगळ्यांचे आई बाबा हिंडतांना दिसले. त्यातल्या त्यात तिने तिचे आई-बाबा शोधूनच काढले.

सर्व पिल्ले आपल्या आई बाबांबरोबर घरी जायला निघाले. गिडू आज खुप खुष होती. आई बाबांजवळ जाऊन तिने आज काय काय गंमत जंमत केली ते सगळे सांगितले. खुशित येऊन गिडू बाबांच्या पाठीवर बसली.

आज गिडूला चालत चालत घरी जायचेच नव्हते शाळा ते घर हे थोडेसे अंतर सुध्दा गिडूला बाबांच्या पाठीवर बसून आरामात जायचे होते. तिच्या एकूलत्या एक पणाचा हा फायदा होता.

गिडू आणि एकूलती एक ? हे कसं ? प्रश्नच पडला असेल ना तुम्हाला. कोंबड्यांना तर भरपुर पिल्ले असतात मग गिडू ही एकटीच कशी ? तर ........

कहाणी सुरु होते ती त्या भल्या मोठ्या शेतातून. त्या भल्या मोठ्या शेतात चारही बाजुने लाकडी फळयांचे कुंपन होते. त्यात एक मोठ्ठस कोंबड्यांच खुराड होत. बाजुलाच वाळलेल्या गवताच्या मोठ्या मोठ्या गंज्या ठेवलेल्या होत्या. आणि गवताच्या बाजुलाच एक मोठी छानशी गवताची खोली होती.

सकाळ झाली कि सगळे कोंबडे खुराड्याच्या बाहेर येऊन एका सुरात कु.....कू.....च.....कू ,.....कु...... चं ..... कू असे आरवत होते.

मग जाड जुड कोंबड्या आणि त्यांच्या पाठीमागे त्यांची प्रत्येकीची सात आठ पिल्ले असे एक एक करुन खुराड्याच्या बाहेर पडत होते. सर्व शेतभर कोंबड्या अन पिल्ले पसरलेले असायचे हे दृश्य सर्व कोंबडे आनंदाने अन कौतुकाने बघत बसत.सर्व कोंबड्या व त्यांची पिल्ले दिवसभर ह्या मोठ्या शेतात हिंडत आणि संध्याकाळ झाली कि आपल्या खुराड्यात जाऊन बसत.

गिडूचा जन्म झाला त्या दिवशी गिडूची आई गिडूसह जन्माला आलेल्या तिच्या सात पिल्लांना घेऊन खुराड्याच्या बाहेर पडली होती. तिला तिच्या मैत्रिणींना तिची पिल्ले दाखवायची होती. तितक्यात त्या

शेतमालकाचा लालू बोक्या तिथे आला. आणि त्या लालूटल्याने लगेच त्या पिल्लांवर झडप घातली.  त्यात गिडू एकटीच वाचली होती.  त्यामुळे तिच्या आई बाबांची गिडू ही लाडकी मुलगी बनली.

अशी ही गिडू एकूलती एक ही आपल्या आईच्या बरोबर एकटीच असायची.  एकटीच आई बरोबर सगळीकडे फिरायची.

घर, शाळा शेतातुन हिंडणे हे तर आता रोजचेच काम झाले होते.  आता पिल्ले जस जसे मोठे होऊ लागले  तस तसे ते निर्भयपणे सगळी कडे फिरत.  आता शाळेत त्यांना सोडवायला जावे लागत नव्हते.  ते स्वत:चे स्वत: एकटेच शाळेत जात असे.  आजचा दिवसही तो रोजच्या सारखाच.

पिल्ले एक एक करुन गवताच्या पायऱ्या चढून शाळेत जाऊ लागली.  गिडूला आता शाळा फार आवडायला लागली होती.

कोकोच पिल्लांना रोज नविन नविन गोष्टी शिकवत असे.  जस जसे पिल्ले मोठे होत होती तस तसा पिल्लांचा अभ्यास ही कठीण होत चालला होता.

आज सगळेजण आपले वर्गात आरवण्याचा अभ्यास करत होते. कोंबडी पिल्लू आणि कोंबडा पिल्लू यांचे दोन गट करण्यात आले होते. कोंबडा पिल्लांना अभ्यास दिला होता एका सुरात कूकूचकू करण्याचा आणि कोंबडी पिल्लांना अभ्यास दिला होता एका सुरात क्वॉक करण्याचा सगळयांना फार मजा वाटत होती. वर्गातला आवाज वाढू लागला. सगळ्यांचे मोठमोठ्याने आरवणे सुरु झाले होते. तितक्यात धप्प आवाज आला झाल आता लालूटल्या आला वाटेत सगळ्या पिल्लांना जपले पाहिजे कोकोचनी लगेचच सर्व पिल्लांना एका बाजुला उभ रहायला लावले आणि स्वत: हळूच खिडकिंतुन डोकावून पहायला लागले कि बाहेर कुठे लालूटल्या दिसतोय का ?

पण छे ! कसला लालूटल्या बिलूटल्या काही नव्हता तिथे

वर्गातलाच एक वात्रट मुलगा गट्टू धप्पकन पडला होता.

सगळे आपले वर्गाच्या बाहेर गवताच्या पटांगणावर येऊन गंमत बघायला लागले.

गट्टू गेटवर हळूहळू चढत होता. गेट वर चढून तो कुंपणावर चढत होता आणि एकदा कुंपणावर चढला कि आपले दोन पंख पसरुन उडी मारत होता. गट्टू पुन्हा पुन्हा तेच करत होता.

गट्टू काय करतोय रे ? कोकोचने त्याच्या जवळ जाऊन विचारले.

''कोकोच, मला उडायच आहे मी त्याची प्रॅक्टीस करतोय.''

हो का ! मग कर हं प्रॅक़्टीस आणि उडायला जमल कि आम्हाला पण दाखव बाबा उडून कोकोच त्याला सांगत होते.

''कोकोच, कोकोच, इथेच थांबा ना तुम्ही, मी आत्ता उडून दाखवतो तुम्हाला ''.

गट्टूने सांगितल्यामुळे कोकोचला तिथे थांबावेच लागले.

गट्टू परत भरभर कुंपणावर चढला.

‘‘हं आता बघा आता मी उडेनच.’’

गट्टूने कुंपणावरुन उडी घेतली आपले दोन्ही पंख हवेत पसरले पण ...........परत धप्प........ तो परत धप्पदिशी जमिनीवर येऊन फत्कल मारुन बसला.

‘‘चल, गट्टू आता आपण वर्गात जाऊ, इतर अभ्यास करु. उडणं तर काय होईलच नंतर.’’

कोकोचने सांगितल्यानंतर गट्टूने ऐकले सुध्दा तो वर्गात येऊन बसला पण त्याचे लक्ष हे उडण्याकडेच होते.

‘‘मुलांनो तुम्ही आता काही लहान नाही राहिले. सगळे मोठे झाले आहात ना ? मग सगळ्यांना आरवता आलेच पाहिजे. त्यासाठी आपण आरवण्याचा खुप अभ्यास केला पाहिजे. चला सगळे करा बर आपला सराव .

कोकोचने मुलांना त्यांच्या अभ्यासाला लावून दिले.

कोकोच आज गट्टूचा विचार करत बसले हया पिल्लाला आता कस समजवावं. पण आपल्या सांगण्यापेक्षा तो स्वत:च काही शिकला तर फार बर होईन.

गट्टू आणि गिडू गप्पा मारत बसले होते. गट्टू बरोबर काय आत गिडूला पण उडण्याची इच्छा झाली का ? काय माहित.

शाळा सुटली तसे सगळी पिल्ले वर्गाबाहेर पडली. आता मोठे झाल्यामुळे आई बाबा पण घ्यायला नाही आले तरी ते आपले बरोबरच घरी जायचे. तसेही त्यांचें आई बाबा शाळेच्या अवतीभवतीच भटकत बसलेले असायचे.

आज सगळेजण भटकत भटकत गेटपाशी गेले. कोणी गेट वर चढले, कोणी कुंपनावर चढले प्रत्येक जण आपला उडण्याचा प्रयोग करु लागले. थोड्या वेळानंतर सगळ्यांनीच उडण्याचा नाद सोडून दिला आणि सगळे आपल्या भटकण्याच्या कामाला लागले पण गट्टू आणि गिडू यांनी काही उडण्याचा नाद नाही सोडला

ते आपले सतत उडण्याचा प्रयत्न करु लागले. एक दोन वेळेस पंख हलवले तरी परत ते जमिनीवरच येऊन पडायचे.

खुप थकल्यानंतर दोघे आपल्या घरी गेले. जाळीतून बाहेरची गंमत बघत बघत ते उडण्याच्याच गप्पा मारत बसले.

''गिडू हे कावळा चिमणी कसे गं छान उंच उंच उडत जातात. किती मजा येत असेल हयांना आपण पण आता उडायला शिकायचच बरं का ! '' गट्टूने गिडूला सांगितले. अचानक गिडूच लक्ष समोर तिच्या शाळेकडे गेले. आणि गिडूच्या एक गम्मत लक्षात आली. ''अरे आपली शाळा गेटपेक्षा उंच आहे. आपण वर्गाच्या छतावर उभ राहिलो तर जास्त चांगल उडू शकू.

''खरच गं, आपण असच करु,''

दोघांना शक्य असत तर ते उडण्यासाठी आत्ताच बाहेर पडले असते पण रात्रीच लालूटल्याच्या भीतीने आपल्याला कोणीच बाहेर जाऊ देणार नाही हे त्यांना माहीत होते. आता त्यांना सकाळची वाट बघत बसावेच लागणार होते.

दुसऱ्या दिवशी सकाळ झाल्या झाल्या सगळे कोंबडे गिडू, गट्टूने सकाळची न्याहारी केली आणि निघाले शाळेच्या दिशेने अरे आत्ता कुठे शाळेत जाता आता तर लहान पिल्लांची शाळा आहे.

पण इतरांकडे लक्ष द्यायला थोडी वेळ होता त्यांच्या कडे ? आणि नुसत इकडून तिकडे हिंडण्यात वेळ घालवणारे हे पिल्ले ह्यांना काय कळणार उडण्याची मजा.

थोडासा शिष्टपणाचा भाव त्यांच्या चेहऱ्यावर उमटला होता.

ते तडक शाळेच्या दिशेने गेले. कोकोच आत वर्गात होते. त्यांना कळणार नाही अशा रितीने गुपचुप लपत छपत त्यांनी शाळेच्या पायऱ्या चढल्या. हळूच गवताच्या ढिगावर चढले गवताच्या ढिगावरुन बाहेरच्या खिडकीवर चढले आणि मग आरामात वरती छतावर चढले.

छतावरुन थोडा खुडखुड आवाज झाला. कोकोचच्या ते लगेच लक्षात आले कि वर्गाच्या छतावर कोणीतरी चढलय. ह्या गोष्टीकडे त्यांनी थोड दुर्लक्षच केल.

गट्टू आणि गिडू मग छताच्या एका टोकापाशी गेलं. ''ह चल आता उडी घेऊ आणि नंतर आरामात उडायला जमेल.''

दोघे उडी मारायच्या तयारीत होते आणि एक...दोन.....तीन असे म्हणत दोघांनी वरुन उडी घेतली. आपले पंख फडफडले दोन तीन वेळेस छान फडफडताही आले पण हे काय परत धप्प ........ परत धप्पकन जमिनीवर ''अरे कोण आहे रे '' कोकोच मोठ्याने आवाज देत बाहेर आले, तर हे काय हा तर कालचाच प्रकार उडण्याचा.

''वा !आज गिडू पण आहे वाटत तुझ्या सोबत ? मग काय झाल ? जमल का उडायला ? तुम्हाला जमल कि आम्हालापण शिकवा हं मुलांनो ''

कोकोच पुन्हा वर्गात निघुन गेले एकदा, दोनदा, तिनदा आणि पुन्हा पुन्हा त्यांनी तोच प्रकार केला. पण दोघांनाही उडता काही आल नाही शेवटी शाळेची वेळ झाली दोघे शाळेत गेले.

वर्गात सगळे मित्रमैत्रिणी जमले होते. सगळ्यांचा विषय ह्या दोघांचे उडणे हाच होता. काल सगळ्यांनी उडण्याचा नाद सोडला होता. परंतु गिडू आणि गट्टू हयांना अजूनही उडण्याची जाम इच्छा होती.

‘हं गिडू आणि गट्टू काय चालली होती तुमची छतावरची खुडखुड माझ लक्ष होत तुमच्याकडे. हं, चला आता सगळे काल सारखेच दोन गट तयार करा.

कोकोचने तर सगळ्यांनाच असे सांगितले. मग गिडू आणि गट्टू हे त्यांच्या पासून वेगळे का उभे राहिले ? ते जणू हया वर्गातले नव्हतेच.

वर्गातली सर्व मोठी पिल्ले आज त्यांचा शाळेतला शेवटचा प्राजेक्ट करणार होते आणि ह्या आजच्या शाळेनंतर त्यांची शाळा ही कायमचीच संपणार होती. कोंबडा पिल्ले आज कागद काड्या गोळ्या करुन

आणणार होते आणि कोंबडी पिल्ले त्या कागद काड्यांना एकत्र छान रचून उबदार खोपट तयार करणार होत्या. सर्वांचे काम चालू झाले.

गिडू आणि गट्टू हळूच वर्गाच्या बाहेर आले. परत छतावरती चढले, त्यांना पुन्हा उडण्याचा प्रयत्न करायचा होता. एक दोनदा त्यांनी प्रयत्न ही केला पण असफल झाला. आता ते दोघे शांतपणे छतावर बसून राहिले.

तितक्यात गिडूचे लक्ष झाडाकडे गेले.

‘‘गट्टू ए गट्टू, लवकर तिकडे बघ, झाडाकडे बघ नां ! अरे ते झाडाचे पान बघ, झाडावरुन गळून पडल्यानंतरही हवेत कस उडत चाललयं. चल आपण पण जाऊ झाडावर आणि तिथून उडू, आता आपण त्या पानाप्रमाणेच हवेत उडत उडत जाऊ. चल पटकन चल.’’

‘‘गिडूने घाईघाईतच गट्टूला ओढत झाडापाशी आणले गट्टू व गिडू घाईघाईतच झाडावर चढायला लागले पण थोडे अंतर चढल्यानंतर ते घसरुन खाली यायचे. पुन्हा पुन्हा तेच होत होते. थकून जरा वेळ ते झाडापाशीच शांत बसले.

‘‘अग गिडू हे झाड फारच सटकाळ आहे गं. मला नाही वाटत आपण यावर चढू शकू.’’

‘‘अरे पण गट्टू हे निलगिरीचे झाड सर्वात उंच आहे आपण जितके उंच जाऊ तितके चांगले उडू नां. मग करुच कि प्रयत्न.’’

‘‘गिडू, चल त्यापेक्षा आपण त्या आंब्याच्या खरबडीत झाडावर जाऊ.’’

गिडू आणि गट्टू आता आंब्याच्या झाडापाशी जायला निघाले.

कोकोच वर्गातल्या खिडकीतुन त्यांची गंमत बघतच होते.

‘‘वा! ह्या झाडावरुन पाय सटकत नाही गं गिडू, चल आपण सर्वात वरच्या फांदीवर जाऊ

गिडू आणि गट्टू झाडाच्या सर्वात वरच्या फांदीवर जाऊन उभे राहिले.

कोकोच त्यांच्या जवळ येऊन पोहोचले.

''अरे चला, खाली उतरा मुलांनो.''

''नाही, कोकोच आज आम्ही उडणारच '' असे म्हणत लगेचच दोघांनी झाडावरुन उडी घेतली. आपले पंख फडफडले दोन चार वेळेस पंख फडफडल्या नंतर ते खाली खाली येऊ लागले. आता आपण आदळणार याची पूर्ण कल्पना त्यांना आली त्यांनी परत पंख फडफडण्यास सुरुवात केली. पण दोघेही धप्पदिशी खाली जमिनीवर पडलेच.

अरे मुलांनो आपले पंख हे उडण्यासाठी तयार नसतात.देवाने आपल्याला हे जाडजुड शरीर दिलेले आहे ते घेऊन आपल्याला आकाशात उंच नाही उडता येणार. त्यामुळे खेळण्या, मज्जाकरण्यापर्यंतच उडण हे ठिक आहे. हे तुम्ही दोघे निट समजून घ्या. पण तुम्ही उडण्याचा इतका छान प्रयत्न तरी केला. हेच किती छान आहे नां !

कोकोचचे म्हणणे दोघांना पटले.  कोकोच बरोबर दोघेही वर्गात जाऊन इतरांप्रमाणे अभ्यास करु लागले.

गिडू आणि गट्टू अजूनही उडण्याचा प्रयत्न करतात का?  करतातच आणि आता ते कुंपणावरुनच छान उडतात पण.

# ई साहित्य प्रतिष्ठान

आताच्या लहान मुलांना मोठेपणी इंटरनेटशिवाय पर्याय नसणार. कॉंप्युटर आणि मोबाईल शिवाय काम करता येणार नाही. म्हणून त्यांना कॉंप्युटरची आवड लावायला हवी. आतापासूनच.

पण इंटरनेटवर मुलांना आवडेल आणि त्यांनी पहावं असं मराठी भाषेत फ़ारसं काहीच नाही.

ई साहित्य प्रतिष्ठान यावर मात करण्याचा आणि इंटरनेटवर जास्तीत जास्त बालसाहित्य मराठीतून उपलब्ध करून देण्याचा प्रयत्न करते. या प्रयत्नांत तुमची साथ हवी. मनापासून.

तुम्ही खूप काही करू शकता. कृपया संपर्क साधा.

टीम ई साहित्य
esahity@gmail.com

# अनघा हिरे



अनघा हिरे या एक प्रसिद्ध लेखिका असून त्यांनी आजवर **अने**क पुस्तके लिहीली व अनुवादित केली आहेत. यात Nationala Book Trust **तर्फ़े बावीस भाषांतून अनुवादित होऊ घातलेल्या "मधूचे मधप्रेम" या पुस्तकाचा** समावेश आहे. नेपाली मेंढूक के साहसी कारनामे, डॅगन त्सुनामी (जपानी लोक कथा ) The letters from the forest school आदी पुस्तकांचे त्यांनी केलेले अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत. या छापिल पुस्तकांबरोबरोबरच त्यांनी **ढ ढ ढगुल्या**, **पक्ष्यांना रंग कसे मिळाले आदी** ई पुस्तके लिहीली आहेत. तसेच बालनेटाक्षरी या ई मॅगझीनचे संपादनही केले आहे.

अनघाताई ई साहित्य प्रतिष्ठानचा बालविभाग प्रमुख आहेत. त्याशिवाय "माझ्या मना ई प्रकाशन" च्या त्या मुख्य संपादिकाही आहेत. **ज्या गोष्टीत आनंद मिळतो त्या गोष्टीत झोकून देण्याचा त्यांचा स्वभाव व हेच त्यांचे वैशिष्ट्य म्हणता येईल.**